महाराष्ट्र विकास सेवा गट -ब मधील अधिकाऱ्यांना महाराष्ट्र विकास सेवा गट-अ मध्ये तदर्थ पदोन्नती.

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
## शासन आदेश क्रमांक : मविसे-१०१५/प्र.क्र.१८/२०१५/आस्था-३,

बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई - ४०० ००१.
तारीख: १७ डिसेंबर, २०१८.

**संदर्भ :-**

१) शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक : एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.१५६/का.१२, दिनांक २८.०४.२०१५

२) शासन अधिसूचना,सामान्य प्रशासन विभाग क्रमांक : एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.१५६/का.१२, दिनांक १६.७.२०१५.

३) शासन अधिसूचना,सामान्य प्रशासन विभाग क्रमांक : एसआरव्ही-२०१७/प्र.क्र.११४/का.१२, दिनांक १५.६.२०१७.

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र विकास सेवेतील सहायक गट विकास अधिकारी गट -ब मधील अधिकाऱ्यांना उप मुख्य कार्यकारी अधिकारी / गट विकास अधिकारी गट-अ या संवर्गात पीबी-३ वेतनश्रेणी रुपये १५६००-३९१०० ग्रेडवेतन ५४०० या वेतनश्रेणीत या आदेशान्वये तदर्थ पदोन्नतीने नियुक्ती देण्यात येत आहे.

तद्नुषंगाने शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग, क्र. एसआरव्ही-२०१५/ प्र.क्र.१५६/ का.१२, दिनांक २८.०४.२०१५, शासन अधिसूचना सामान्य प्रशासन विभाग क्र. एसआरव्ही-२०१५ /प्र.क्र.१५६/का.१२, दिनांक १६.७.२०१५ आणि शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग एसआरव्ही-२०१७/प्र.क्र.११४/ का.१२, दिनांक १५.६.२०१७ नुसार पदोन्नतीने नियुक्तीसाठी विहीत केलेल्या महसुली विभाग वाटप नियम , २०१७ मधील तरतूदींच्या अधीन व शासनाच्या मान्यतेने

श्री.व्ही.डी. दांगट यांना गट विकास अधिकारी, पंचायत समिती जुन्नर, जि.पुणे या ठिकाणी तदर्थ पदोन्नती खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

अ) सदर तदर्थ पदोन्नती ११ महिने अथवा आयोग पुरस्कृत उमेदवार उपलब्ध होतील, यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत राहील. दरम्यानच्या काळात आयोग पुरस्कृत उमेदवार प्राप्त झाल्यास, तदर्थ पदोन्नत झालेल्या अधिकाऱ्यांना पदावनत करण्यात येईल. सदर तदर्थ पदोन्नती तात्पुरत्या स्वरुपात असून सदर पदावर संबंधित अधिकाऱ्याचा कायम स्वरुपी धारणाधिकार राहणार नाही.

ब) सदर तदर्थ पदोन्नती ही आरक्षणासंदर्भात मा.उच्च न्यायालयात प्रलंबित असणाऱ्या याचिका क्र.८४५२/२००४ मधील T.A. १/२०१४ आणि T.A. २/२०१४ च्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहील. तसेच, मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी याचिका क्र.२७९७/२०१५ मध्ये दिनांक ४.८.२०१७ रोजी दिलेल्या निर्णयान्वये पदोन्नतीमधील आरक्षण अवैध ठरविले आहे. मा.उच्च न्यायालयाच्या निर्णयाविरोधात राज्य शासनाने मा.सर्वोच्च न्यायालयात विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ दाखल केली आहे. सदर याचिका अद्याप प्रलंबित आहे. सामान्य प्रशासन विभागाने दिनांक २९.१२.२०१७ रोजीच्या पत्रान्वये तूर्तास पदोन्नतीच्या कोटयातील खुल्या प्रवर्गातील रिक्त पदे तात्पुरत्या स्वरुपात सेवाज्येष्ठतेनुसार मा.सर्वोच्च न्यायालयाच्या निर्णयाच्या अधीन राहून भरण्यात यावीत तसेच मागासवर्गीय अधिकारी / कर्मचारी यांना पदोन्नती देण्यापूर्वी ते आरक्षणाचा लाभ मिळून सेवाज्येष्ठता यादीत वरच्या स्थानावर आले नाहीत याची खात्री करण्यात यावी, असे आदेश सर्व प्रशासकीय विभागांना दिले आहेत. त्यानुसार श्री.दांगट यांना खुल्या प्रवर्गातील रिक्त पदावर निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात तदर्थ पदोन्नती देण्यात येत आहे.

क) सदर तदर्थ पदोन्नती ही, जे अधिकारी ज्येष्ठ आहेत, परंतु ज्यांची प्रकरणे विचारार्थ खुली ठेवण्यात आलेली आहेत, अशा अधिका-यांच्या ज्येष्ठतेस बाधा न आणता देण्यात येत आहे.

ड) वरील अधिकाऱ्यांना तदर्थ पदोन्नती महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

इ) सदर तदर्थ पदोन्नती ही त्यांच्या वयाच्या ५०/५५ व्या वर्षानंतर पुनर्विलोकन करावयाच्या शासन निर्णयाच्या अधीन राहील. सदर पदोन्नती कोणतीही विभागीय चौकशी सुरु नाही या धारणेच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

३. तदर्थ पदोन्नतीने नियुक्ती देण्यात आलेल्या श्री .व्ही.डी. दांगट यांनी त्यांच्या नियुक्तीचे आदेश प्राप्त झाल्यापासून सात दिवसाच्या आत हजर होणे आवश्यक आहे . त्याप्रमाणे ते विहीत मुदतीत नियुक्तीच्या ठिकाणी हजर झाले नाहीत, तर त्यांना नियुक्ती नको असे समजून, शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: एसआरव्ही-१०८७/११३१/प्र.क्र.११/८९/१२, दिनांक ३०.४.१९९१ मधील तरतुदीनुसार त्यांची नियुक्ती रद्द करण्यात येईल.

४. संबंधित विभागीय आयुक्त /मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी स्थानिक पर्यायी व्यवस्था करुन , श्री.व्ही.डी. दांगट यांना तात्काळ कार्यमुक्त करावे आणि नवीन नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ हजर होण्याबाबत सूचना द्याव्यात. तसेच श्री.दांगट यांनी पदभार स्वीकारल्यानंतर त्याचा अहवाल शासनास सादर करावा.

५. तदर्थ पदोन्नतीने नियुक्ती दिलेल्या श्री .व्ही.डी. दांगट यांनी नवीन नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ रुजू व्हावे. तसेच, त्यांनी अनधिकृतरित्या रजेवर जाऊ नये. यासंदर्भात त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभाग परिपत्रक क्रमांक सीडीआर-१०८२/२५६७/२८/११, दिनांक ३०.८.१९८२ अन्वये दिलेल्या सूचनांकडे वेधण्यात येत आहे. तसेच नियुक्ती रद्द करणेसाठी कुठल्याही स्वरुपाचे आवेदन करु नये. तसे केल्यास श्री.दांगट शिस्तभंगाच्या कारवाई पात्र ठरतील याची त्यांनी नोंद घ्यावी.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१२०६१५२११७९७२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ananda Shankar Shendage

Digitally signed by Ananda Shankar Shendage
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Rural Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0db7067f83b51744741b4485650edc8705560188be635df819605b4913ead056, serialNumber=dced31ba3ba0e455430f67304905c6e3544dae39602268d4cf2844818a1f80a4, cn=Ananda Shankar Shendage
Date: 2018.12.17 16:14:46 +05'30'

(आ.शं. शेंडगे)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. मा. मंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव
२. मा. राज्यमंत्री ( ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव
३. मा.सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने)

४. मा. सचिव (ग्राम विकास व पंचायत राज ) यांचे स्वीय सहायक
५. विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे
६. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे
७. मुख्य लेखा व वित्त अधिकारी जिल्हा परिषद, पुणे
८. महालेखापाल- १ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
९. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१०. श्री.व्ही.डी. दांगट, सहायक गट विकास अधिकारी, पंचायत समिती जुन्नर,जि.पुणे (मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे यांच्यामार्फत)
११. सामान्य प्रशासन विभाग, (कार्यासन-१२/कार्यासन-१६ ब), मंत्रालय, मुंबई
१२. कार्यासन क्रमांक आस्था-२, ग्राम विकास व जलसंधारण विभाग
१३. कार्यासन क्रमांक आस्था-३ अ, ग्राम विकास व जलसंधारण विभाग
१४. निवड नस्ती, का.क्र. आस्था-३, ग्राम विकास व जलसंधारण विभाग